**स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)**
**दिनांक १ ऑगस्ट ते ३१ ऑगस्ट २०१८ या कालावधीत कचरा विलगीकरणासाठी " स्वच्छ ऑगस्ट क्रांती" मोहिम राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक, क्रमांक: स्वमअ-२०१८/प्र. क्र.२६२/नवि-३४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
४ था मजला, मंत्रालय, मुंबई
दिनांक:- १ ऑगस्ट, २०१८.

**पहा :**

(१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४, दि. १५ मे, २०१५.
(२) शासन परिपत्रक, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ-२०१७/प्र.क्र.६०/नवि-३४, दि. २९ एप्रिल, २०१७
(३) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वमअ-२०१८/प्र. क्र.७९/नवि-३४, दि. २९ जानेवारी, २०१८

**परिपत्रक:**

संपूर्ण भारत देश ऑक्टोबर, २०१९ पर्यंत स्वच्छ करण्याच्या उद्देशाने दिनांक २ ऑक्टोबर, २०१४ पासून "स्वच्छ भारत अभियान" देशभरात राबविण्यात येत आहे. त्याच धर्तीवर स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) ची अंमलबजावणी संपूर्ण राज्यात "मिशन मोड" पध्दतीने सुरू आहे. या अभियानांतर्गत शहरे **"हागणदारी मुक्त"** करणे व घनकचरा व्यवस्थापनातंर्गत **"स्वच्छ"** करणे या दोन प्रमुख बाबींचा समावेश आहे.

२. स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) ची अंमलबजावणी करून पहिल्या टप्प्यात राज्याचा नागरी भाग दिनांक१ ऑक्टोबर, २०१७ रोजी "हागणदारी मुक्त" झाल्याचे मा. राष्ट्रपती महोदयांच्या उपस्थित घोषित करण्यात आले आहे. तसेच या अभियानाच्या दुसऱ्या टप्प्यात राज्यातील सर्व शहरे घनकचरा व्यवस्थापनातंर्गत **"स्वच्छ"** करावयाची आहेत. त्यानुसार, राज्याच्या नागरी भागातील कचऱ्याचे विलगीकरण करण्यासाठी १ मे, २०१७ पासून "कचरा लाख मोलाचा" ही मोहिम राबविण्यात येत आहे.

३. स्वच्छ भारत अभियानांतर्गत देशातील सर्व शहरांचे सर्वेक्षण केंद्र शासनाने जानेवारी, २०१८ मध्ये केले. या "स्वच्छ सर्वेक्षण-२०१८" मध्ये काही शहरांनी कचऱ्याचे विलगीकरण, संकलन व वाहतूक तसेच प्रक्रिया यामध्ये उत्कृष्ट कामगीरी केल्याने त्यांचा राज्यपातळीवर तसेच देशपातळीवर चांगला गुणानुक्रम मिळविता आला. तर काही शहरांची कचऱ्याचे विलगीकरण, संकलन व वाहतूक यामधील कामगीरी समाधानकारक न झाल्याने त्यांचा देशपातळीवर गुणानुक्रम खालावला आहे.

४. नागरी घनकचरा व्यवस्थापनाचा मुख्य गाभा, कचऱ्याचे विलगीकरण करून त्यावर शास्त्रोक्त पद्धतीने प्रक्रिया करणे हा आहे. घनकचऱ्याचे विलगीकरण केल्याशिवाय घनकचऱ्यास मुल्य प्राप्त होत नाही, हा आजपर्यंतचा अनुभव आहे. आता पर्यंत या क्षेत्रात उभारण्यात आलेल्या प्रकल्पावरून असे लक्षात आले आहे की,

घनकचऱ्याचे विलगीकरण न करता त्यावर प्रक्रीया करणारे प्रकल्प यशस्वी होत नाहीत. सदर वस्तुस्थिती विचारात घेऊन, घनकचरा व्यवस्थापनातंर्गत शहरे स्वच्छ करण्यासाठी शहरात निर्माण होणाऱ्या १००% कचऱ्याचे विलगीकरण करणे अत्यावश्यक आहे. तसेच, स्वच्छतेच्या बाबतीत नागरीकांमध्ये जनजागृती करुन स्वच्छतेच्या सवयी अंगी बिंबविण्यासाठी प्रयत्न करणे आवश्यक आहे. त्यासाठी राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी १ ऑगस्ट, २०१८ ते ३१ ऑगस्ट, २०१८ या कालावधीत "स्वच्छ ऑगस्ट क्रांती" ही मोहिम राबविण्यास शासन मान्यता देत आहे.

५. सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी उपरोक्त कालावधीत शहरात निर्माण होणाऱ्या घनकचऱ्यापैकी किमान ८० टक्के कचऱ्याचे निर्मितीच्या जागी विलगीकरण करणे, या कचऱ्याचे घरोघरी जावून १०० टक्के संकलन व वाहतूक करणे व १०० टक्के विलगीकृत कचऱ्यावर शास्त्रोक्त प्रक्रीया करणे आवश्यक आहे. या अनुषंगाने नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी करावयाच्या बाबींचा सविस्तर तपशील सोबतच्या जोडपत्रात देण्यात आला आहे.

६. वरील प्रमाणे कार्यवाही करण्यासाठी संबंधित शहराचे नगराध्यक्ष व मुख्याधिकारी हे सर्वस्वी जबाबदार राहतील. ज्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्था या मोहिमेच्या कालावधीत उपरोक्त प्रमाणे उद्दिष्टपूर्ती करतील त्याच नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना शासन स्तरावरून प्राधान्याने देण्यात येणारी अनुदाने (उदा. रस्ता अनुदान, वैशिष्ट्यपूर्ण अनुदान इत्यादी) देण्याबाबत शासन विचार करील.

७. "स्वच्छ ऑगस्ट क्रांती" मोहिमे अंतर्गत दररोज केलेल्या कार्यवाहीचा अहवाल संबधित जिल्ह्याचे जिल्हा प्रशासन अधिकारी यांच्याकडे पाठवावा. जिल्हा प्रशासन अधिकाऱ्यांनी जिल्ह्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचा दररोज अहवाल संकलित करावा. जिल्हा प्रशासन अधिकाऱ्यांनी या अहवालानुसार प्रत्यक्ष कार्यवाही होत आहे किंवा नाही याची आठवड्यातुन एकदा संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस भेट देवून खात्री करावी. तसेच त्याबाबतचा अहवाल विभागीय आयुक्त कार्यालयास व राज्य् अभियान संचालनालयाकडे पाठविण्यात यावा. प्रादेशिक उपसंचालक/सहायक संचालक, विभागीय आयुक्त कार्यालय यांनी अशाप्रकारे प्राप्त अहवालांची छाननी करुन विभागामध्ये ज्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमधील अंमलबजावणी असमाधानकारक आहे अशा शहरांना स्वत: भेट देवून अंमलबजावणी प्रभावीपणे होण्यासाठी सूचना करुन त्यांच्याकडून तशी कामगिरी करुन घ्यावी व राज्य अभियान संचालक यांच्याकडे अहवाल पाठवावा.

८. "स्वच्छ ऑगस्ट क्रांती" या मोहिमे अंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमार्फत करण्यात आलेल्या कार्यवाहीचा आढावा प्रधान सचिव (नवि-२) यांच्या स्तरावर सप्टेंबर, २०१८ मध्ये पहिल्या आठवडयात घेण्यात येईल.

९. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०२१७१६५६५३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas Madhukar Badhan

Digitally signed by Kailas Madhukar Badhan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=22804d8f98c03e9a67ca8eca6a02e7eaab4bcc4a3d59dfce4f1c7189ab74b085, serialNumber=e83c1c73de120837488d76379734db4868992e2b35ba1df8cfea9650fcff780f, cn=Kailas Madhukar Badhan
Date: 2018.08.02 17:21:36 +05'30'

**(कैलास बधान)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा .मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई
४. मा .राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६. विभागीय आयुक्त, महसूल विभाग (सर्व).
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
८. जिल्हाधिकारी, सर्व
९. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
१०. मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायत (सर्व).
११. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
१२. निवडनस्ती, नवि-३४.

शासन परिपत्रक, क्रमांक: स्वमअ-२०१८/प्र.क्र.२६२/नवि-३४, दिनांक १ ऑगस्ट, २०१८ सोबतचे

<u>जोडपत्र</u>

**(अ) घरोघरी जावून घनकचरा संकलन व वाहतूक करणे** ( Door to Door Collecton and Transportaion)

(१) शहरातील सर्व प्रॉपर्टीज व प्रभाग विचारात घेवून घनकचऱ्याचे संकलन करण्याकरिता उपलब्ध असलेल्या घंटागाडयांच्या क्षमतेनुसार रूट मॅप व घंटागाडीचे वेळापत्रक तयार करून त्याव्दारे शहरातील १०० टक्के प्रॉपर्टीज मधून रोज कचरा संकलन होईल याची दक्षता घेण्यात यावी.

(२) प्रत्येक प्रभागामध्ये सदर रूट मॅपला व वेळापत्रकाला व्यापक प्रमाणात प्रसिद्धी देण्यात यावी व वेळापत्रकाचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

(३) संकलित केलेला विलगीकृत कचरा वाहतूक करताना एकत्र होणार नाही दक्षता घेण्यात यावी.

(४) नालीचा गाळ व राडा रोडा (C & D Waste) यांची वाहतूक करण्यासाठी स्वतंत्र वाहनाची व्यवस्था आसावी.

(५) कचरा संकलनाचे व वाहतुकीचे लॉगबुक तयार करून ते रोजच्या रोज अद्ययावत करावे.

**(ब) घनकचऱ्याचे निर्मितीच्या जागी विलगीकरण करणे** (Segregation at Source ):

(१) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी घरोघर जावून कचरा संकलन करताना तो ओला व सूका असा विलगीकृत स्वरूपात संकलन करावा.

(२) विलगीकृत कचऱ्याच्या संकलनासाठी घंटागाडी मध्ये २ वेगवेगळया कप्प्यांची (कंपार्टमेंट) व्यवस्था करण्यात यावी.

(३) घंटागाडी सोबत चालका व्यतिरिक्त एक कर्मचारी नेमण्यात यावा. या कर्मचाऱ्याने कचऱ्याचे विलगीकरण करण्याबाबत नागरीकांचे प्रबोधन करावे. नागरीकांनी ओला व सूका असा मिश्र कचरा आणल्यास तो विलगीकृत करण्याबाबत ३ ते ४ दिवस संबंधित कर्मचाऱ्याने प्रात्यक्षिक सादर करावे. त्यानंतर ही मिश्र कचरा आणल्यास संबंधित नागरीकांकडून कचऱ्याचे विलगीकरण करुन घ्यावे.

(४) कचरा निर्मात्याने, निर्मितीच्या जागी कचऱ्याचे विलगीकरण करावे अशी जबाबदारी घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ अन्वये निश्चित करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने शहरातील नागरीकांनी कचऱ्याचे विलगीकरण करावे यासाठी जनजागृती करण्यात यावी. यामध्ये शहरांमधील स्वयंसहाय्यता गट /शाळा/महाविदयालय/अशासकिय संस्था इत्यादींच्या समावेश असावा.

(५) शहरातील कचरा वेचकांना याकामामध्ये समाविष्ट करून घेण्यात यावे.

(६) डे-एन.यु.एल.एम. अंतर्गत बचता गटांचा याकामामध्ये समाविष्ट करून घेण्यात यावे.

**(क) विलगीकृत कचऱ्यावर शास्त्रोक्त प्रक्रीया करणे :**

(१) विलगीकरण केलेल्या कचऱ्यापैकी ओल्या कचऱ्यावर कंपोस्टींग किंवा बायो-मिथेनायजेशन या शास्त्रोक्त पद्धतीने केंद्रित अथवा विकेंद्रित पध्दतीने प्रक्रिया करण्यात यावी.

(२) राज्यातील सर्व शहरांचे घनकचरा व्यवस्थापनाचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यात आले आहेत. या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये शहरातील कचऱ्यावर शास्त्रोक्त प्रक्रीया करण्यासाठी उपाय योजना करण्यात आलेली आहे. परंतु, याची अंमलबजावणी करण्यासाठी काही कालावधी लागणार आहे. तो पर्यत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शहरात उपलब्ध असलेल्या जागा व साहित्यांचा उपयोग करून विलगीकृत कचऱ्यावर केंद्रित अथवा विकेंद्रित पध्दतीने प्रक्रिया करवी.

(३) शहरातील विलगीकरण केलेल्या कचऱ्यापैकी सुक्या कचऱ्याचे पुनश्च विलगीकरण करून तो पुनर्प्रक्रिया करण्यासाठी पाठविण्यात यावा. तसेच पुनर्प्रक्रिया होवू न शकणारा उर्वरित सुका कचरा भरावभूमीवर पाठविण्यात यावा. (प्रमाण मानकानुसार याचे प्रमाण एकूण सुक्या कचऱ्याच्या १५ ते २० टक्क्यापेक्षा जास्त नसावे.)

**(ड) विलगीकरण, संकलन व वाहतुक तसेच शास्त्रोक्त प्रक्रिया करण्यासाठी कायमस्वरुपी व्यवस्था अस्तित्वात आणली पाहिजे. ही व्यवस्था व्यक्ति आधारीत नसावी.**

**(इ) उपरोक्त (अ), (ब) व (क) येथील कामे कंत्राटी पध्दतीने करून घेण्यात येत असतील तर, कंत्राटाच्या अटी व शर्तीनुसार ही कामे करून घेण्याची व त्यानुसार देयके अदा करण्याची जबाबदारी ही संबंधित मुख्याधिकारी यांची राहील.**

-------------